**पुनर्रचित हवामान आधारित फळपीक विमा योजना सन २०१६-१७ मध्ये मृग व आंबिया बहाराकरिता राज्य हिस्साची रक्कम विमा कंपनीस वितरीत करण्यासाठी मंजुरी देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः फवियो-२०१९/प्र.क्र.२/१०- अे,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: ३१ जानेवारी, २०१९

वाचा -

१. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. विमायो-२०१६/प्र.क्र.७७/१४- अे, दि.५.७.२०१६
२. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. विमायो-२०१६/प्र.क्र.१८४/१४- अे, दि.२९.१०.२०१६
३. संचालक विस्तार व प्रशिक्षण, कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र जाक्र.कृआ/ मु.सां/ पुहआफपिवियो/०४/२०१९, दि.४.१.२०१९

**प्रस्तावना :-**

शेतकऱ्यांच्या फळपिकांना हवामान धोक्यापासुन विमा संरक्षण दिल्यास शेतकऱ्यांचे आर्थिक स्थैर्य आबाधीत राखण्याच्या दृष्टीने मदत व्हावी, त्यासाठी राज्यात प्राधान्याने पुर्नरचित हवमान आधरित फळपिक विमा योजना सन २०१६-१७ राबविण्यात येत आहे.विविध हवामान धोक्यांमुळे फळपिकाच्या उत्पादकतेवर विपरीत परीणाम होऊन मोठ्या प्रमाणावर उत्पादनामध्ये घट येते. पर्यायाने शेतकऱ्यांना अपेक्षीत उत्पादन न मिळाल्याने आर्थिक संकटाला तोंड द्यावे लागते. या सर्व बाबींचा विचार करुन शेतकऱ्यांना फळपिक नुकसान भरपाई मिळण्यासाठी एक उपाय म्हणुन पुनर्रचित हवामान आधारीत फळपीक विमा योजना सन २०१६-१७ मध्ये महसूल मंडळ हा घटक धरुन राबविण्यात आली आहे.

प्रधानमंत्री पीक विमा योजनेतंर्गत पुर्नरचित हवामान आधरित फळपिक विमा योजना सन २०१६-१७ मध्ये राबविण्यासाठी संदर्भ क्र. १ व २ मधील शासन निर्णयांन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. योजनेत सन २०१६-१७ मृग व आंबिया बहारासाठी कृषी आयुक्तालयाने सादर केलेल्या मागणीनुसार राज्य हिस्साच्या रक्कमेस वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचारधिन होती.

**शासन निर्णय :-**

पुनर्रचित हवामान आधारीत फळपीक विमा योजनेअंतर्गत कृषी आयुक्तालयाने संदर्भ क्र.३ अन्वये सादर केलेल्या मागणीनुसार **रु.२२,०९,६७७/-** इतकी रक्कम सन २०१६-१७ (मृग व आंबिया) साठी रिलायन्स व श्रीराम या विमा कंपन्याना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत बाबीवर होणरा खर्च खालील लेखाशिर्षाखाली भागविण्यात यावा.

**मागणी क्र. डी -३**
**२४०१ - पीक संवर्धन**
**११०, पीक विमा**
**(००) (०७) हवामान आधारित फळपीक विमा योजना**
**राज्य हिस्सा (२४०१ ९४०२) ३३-अर्थसहाय्य**

३. प्रस्तुत प्रयोजनार्थ सहायक संचालक (लेखा ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर निधी पुनर्रचित हवामान आधारित फळपीक विमा योजना मधील मार्गदर्शक सुचनांनुसार खर्च करण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौचारीक संदर्भ क्र.१०/२०१९/व्यय-१ दि.२५.१.२०१९ अन्वये प्रदान केलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१३११३०२०८३२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Digitally signed by Dr.Kiran Patil
Date: 2019.01.31 13:13:07 +05'30'

**(डॉ. किरण पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
२. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
३. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुण
६. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
८. सहाय्यक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१०. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
११. वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई- ३२
१२. उप सचिव (११-अे /२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
१३. कक्ष अधिकारी (२- अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१४. विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी, स्टॉक एक्सचेंज टॉवर्स, २० वा मजला, दलाल स्ट्रीट,फोर्ट, मुंबई-४०० ०२३
१५. निवड नस्ती (कार्यासन १०-अे)